महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील सेवानिवृत्त कर्मचा-यांच्या सेवानिवृत्तीवेतनापोटी प्राधिकरणाला अनुदान देण्यासाठी तात्पुरत्या स्वरुपात मंजूर करण्यात आलेल्या २२१५A०५२ नवीन लेखाशीर्षास मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मजीप्रा-१११७/प्र.क्र.२३५/पापु-२३**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीखः ३ नोव्हेंबर, २०२१

**वाचा :-**

१. शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः मजीप्रा-२०१४/प्र.क्र.३३(अ)/पापु-२३, दिनांक २३.०३.२०१७.
२. शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग समक्रमांकः मजीप्रा-१११७/प्र.क्र.२३५/पापु-२३, दिनांक ०७.०९.२०१८, दिनांक १०.०१.२०१९ व दिनांक ०९.०७.२०२०

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या कर्मचा-यांच्या वेतन व भत्ते तसेच निवृत्तीवेतनाचे दायित्व शासनाने दिनांक २३.३.२०१७ च्या शासन निर्णयान्वये स्विकारले आहे. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सेवानिवृत्त कर्मचा-यांच्या निवृत्तीवेतनावरील खर्च अदा करण्यासाठी शासनाचे नियमित प्रधान लेखाशिर्ष २०७१ मधून कोषागारामार्फत प्रत्यक्ष निवृत्तीवेतन अदा होण्यासाठी बराच कालावधी लागण्याची शक्यता असल्यामुळे, महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील सेवानिवृत्त कर्मचा-यांच्या सेवानिवृत्ती वेतनापोटी प्राधिकरणाला अनुदान देण्याच्या दृष्टीने तात्पुरत्या स्वरुपात निर्माण करण्यात आलेल्या २२१५A०५२ या नवीन लेखाशीर्षास दिनांक ०९.०७.२०२० च्या शासन निर्णयान्वये सन २०२०-२१ पर्यन्त मुदतवाढ देण्यात आली होती. सदर लेखाशिर्षास सन २०२१-२२ या वर्षासाठी मुदतवाढ देण्यात देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातून सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्तीवेतनासाठी प्राधिकरणाला अनुदान देण्याच्या दृष्टीने आर्थिक तरतूद करण्याकरीता तात्पुरत्या स्वरुपात मंजूर करण्यात आलेल्या २२१५A०५२ या नवीन लेखाशीर्षास सन २०२१-२२ या वर्षासाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक १०३/व्यय-३, दिनांक २६.४.२०२१, तसेच महालेखाकार, मुंबई कार्यालयाचे पत्र क्रमांक सं:ख.वि/चा-१ पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग/यूओआर-४९/२०२१-२२/२६६, दिनांक १७.०८.२०२१ तसेच महालेखाकार, नागपूर कार्यालयाचे पत्र क्रमांक TM/Gr.III/UOR-११/MJP/Pension/४७७, दिनांक ०४.१०.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११०३११५६४९४१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Balasaheb Babasaheb Hajare

Digitally signed by Balasaheb Babasaheb Hajare
DN: cn=Balasaheb Babasaheb Hajare, o=Mantralaya, ou=Water Supply and Sanitation Department, email=balasaheb.hajare@nic.in, c=IN
Date: 2021.11.03 15:46:33 +05'30'

**( बाळासाहेब बा. हजारे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र १, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

प्रत: माहितीस्तव,

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

मा. राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

अप्पर मुख्य सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई.

वित्त विभाग, व्यय-३/ अर्थसंकल्प-१८ कार्यासन, मंत्रालय, मुंबई.

पापु-४ / पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई.

निवडनस्ती, पापु-२३